**सन २०१७ ते सन २०१९ या ३ वर्षांच्या कालावधीमध्ये "५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन आणि देखभाल" या कार्यक्रमांतर्गत सन २०१७ या वर्षाचा नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.६०/नवि-३४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०१७.

वाचा:- १. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१५ / प्र.क्र.१३१/ फ-११, दि. ३१/०३/२०१६.
२. शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्रमांक -संकिर्ण २०१६/प्र.क्र. ६०/नवि ३४,दि.१७/०५/२०१६
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि.१०/१०/२०१६

परिपत्रक -

जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. या उपक्रमाचा भाग म्हणून संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये दि. १ जुलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. यामध्ये वन विभागासह नगर विकास विभाग व इतर शासकीय विभाग समाविष्ट झाले होते.

२. त्याचप्रमाणे दि. १ जुलै, २०१६ च्या कार्यक्रमामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, एन. एस. एस., एन. सी. सी., स्काऊट ॲन्ड गाईडस्, अशासकीय संस्था, स्वयंसेवी संस्था, सामाजिक क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्था, औद्योगिक समूह, सीएसआर, लोकप्रतिनिधी, गृहनिर्माण संस्था, सहकारी संस्था, शासकीय कर्मचारी व अधिकारी इत्यादींचा देखील सहभाग संबंधित विभागांनी घेतला होता. त्या कार्यक्रमाचे नियोजन ते अंमलबजावणी व रोपांचे संरक्षण याबाबत वन विभागाने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांसोबतच नगर विकास विभागांतर्गत क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाची कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना संदर्भ क्र. २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या.

३. लोकांच्या स्वयंस्फूर्त सहभागामुळे २ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट सहजगत्या पूर्ण झाले. दिनांक १ जुलै, २०१६ रोजी एकूण २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीमध्ये रूपांतरीत करण्यास शासनास चांगले यश प्राप्त झाले आहे. मा. पंतप्रधान यांनी दि. ३१ जुलै, २०१६ रोजीच्या "मन की बात" या रेडिओवरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमामध्ये वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत अभिनंदन केले. त्याचबरोबर यापुढील वर्षांमध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबत देखील सूतोवाच केले. त्याशिवाय निरनिराळया धर्मग्रंथांमध्ये नमूद वृक्ष लागवडीचे महत्व विषद केले. त्यानुसार वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवण्याबाबत आवाहन केले.

४. तसेच, “लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड” या संस्थेने या अभिनव उपक्रमाची नोंद घेऊन राज्य शासनास प्रमाणपत्र दिले आहे. आपल्या सर्वांच्या एकत्रित प्रयत्नामुळे हा आगळावेगळा उपक्रम राबविणे शक्य झाले आहे. त्या अनुषंगाने पुढील ३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट मा. मुख्यमंत्री यांचे मान्यतेने शासनाने संदर्भ क्रमांक-३ येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. त्याचबरोबर ५० कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणी बाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. वर्ष २०१६ मध्ये वन विभाग व इतर विभाग मिळून अनुक्रमे ७५ टक्के व २५ टक्के उद्दिष्ट दिले होते. त्याच अनुषंगाने पुढील वर्षासाठी उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. या महत्त्वकांक्षी कार्यक्रमामध्ये सर्व शासकीय विभागांना समाविष्ट केले जाणार आहे.

**सन २०१७ या वर्षात नगर विकास विभागामार्फत करावयाच्या वृक्षारोपणाचे उद्दिष्ट.**

| अ. क्र. | वृक्षरोपणासाठीची स्थळे | सन - २०१७ | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रति वॉर्ड किमान उद्दिष्ट | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थां-निहाय उद्दिष्ट | एकूण |
| १ | महानगरपालिका (एकूण २७) | २०० | २०००० | ५४०००० |
| २ | “अ” वर्ग नगरपरिषद (एकूण १८) | १०० | ३००० | ५४००० |
| ३ | “ब” वर्ग नगरपरिषद (एकूण ७३) | ५० | १००० | ७३००० |
| ४ | “क” वर्ग नगरपरिषद/ नगरपंचायत (एकूण २६७) | ३० | ४५० | १२०१५० |
| ५ | नगर रचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालय, पुणे व त्याअंतर्गत प्रत्येक कार्यालयाचा परिसर | - | १०० | १०० |
| ६ | शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ मर्या. (प्रत्येकी ६ CIDCO कार्यालये ). | - | १०० | ६०० |
| ७ | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण. (कल्याण / ठाणे / वडाळा क्षेत्र.) | - | १०० | ३०० |
| ८ | पुणे महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण व त्या अंतर्गत कार्यालये. | - | १०० | ३०० |
| ९ | पिंपरी - चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, पुणे. | - | १०० | १०० |
| १० | नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर. | - | १०० | १०० |
| | **एकूण** | | | **७८८६५०** |

५. प्रत्येक विभाग आणि त्या अंतर्गत मंडळे/महामंडळ यांच्या करिता उद्दिष्टे निश्चित करताना, जिथे वृक्ष लागवडीस अधिक वाव आहे, ती महत्तम क्षमता विचारात घेतली आहे. त्यानुसार, नगर विकास विभागास संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि. १० ऑक्टोबर, २०१६ मधील विवरणपत्र

क्रमांक ३ मधील अनु.क्र.२ मध्ये नमूद केल्यानुसार ७, ५०, ००० वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट ठरवून देण्यात आले आहे. त्यानुसार वरिलप्रमाणे उद्दिष्ट आणि वृक्षरोपणाची संभाव्य स्थळे निश्चिती करुन देण्यात आलेली आहेत.

६. राज्यातील निरनिराळया विभागामध्ये पावसाची सुरूवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळया वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेवून विभागनिहाय आणि जिल्हानिहाय दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) ठेवण्यात येईल. तसेच वृक्षरोपणाच्या निश्चित तारखा त्या त्या वर्षाचा पावसाळा सुरु होण्यापूर्वी कळविण्यात येतील.

७. सदर कार्यक्रम यशस्वीरित्या राबविण्यासंदर्भात पुढील प्रमाणे निदेश देण्यात येत आहेत:-

(१) सदर कार्यक्रमाचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व समन्वय या करिता खालील प्रमाणे नोडल अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| अ) विभागीय स्तर | : | प्रादेशिक उप संचालक, नगरपरिषद शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय. (सर्व) |
| ब) जिल्हास्तर | : | जिल्हा प्रशासन अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी (नपा शाखा) जिल्हाधिकारी कार्यालय |
| क) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांस्तर | : | महानगरपालिका-संबंधित अति. आयुक्त/उप आयुक्त<br>नगरपरिषदा/नगरपंचायती-संबंधित मुख्याधिकारी |

(२) उपरोक्त नमूद सर्व कार्यालये व सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सदर कार्यक्रमांतर्गत वृक्षलागवड करण्यात येणाऱ्या स्थळांची निश्चिती करावी. (प्रत्येक वर्षी ३० नोव्हेंबर पर्यंत)

(३) प्रत्येक स्थळाविषयी सूक्ष्म नियोजन, करणे योग्य रोपांची उपलब्धता, मनुष्यबळाची निश्चिती, वृक्ष लागवडीच्या काळात दरदिवशी घेणाऱ्या वृक्षारोपणाचा आराखडा तयार करणे. (प्रत्येक वर्षी ३१ डिसेंबर पर्यंत) तसेच, स्थळनिहाय वृक्ष लागवडीसाठी एका जबाबदार अधिकाऱी/कर्मचाऱी यांची नेमणूक करण्यात यावी. स्थळ निश्चितीची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर, सचिव (वने) आणि या विभागाकडे Geo-tagging या संगणकीय प्रणालीद्वारे अक्षांश-रेखांशासह (Latitude-Longitude) व शक्य तिथे GPS Location सह वेळोवेळी या शासन परिपत्रका सोबतच्या विवरणपत्र-१ व २ मध्ये पाठविण्यात यावी.

(४) वृक्षलागवडीच्या कार्यक्रमातंर्गत पूर्व पावसाळी कामे विहित कालावधीत पार पाडण्यासाठी नियोजन करावे. प्रचलित निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, माती, खत, किटकनाशके इ. भरून सदर खड्डे रोप लागवडीसाठी तयार ठेवणे ही कामे प्रत्येक वर्षी दिनांक ३१ मार्च पर्यंत पूर्ण करण्यात यावीत.

(५) वृक्षलागवडीच्या स्थळांवर जवळच्या कोणत्याही रोपवाटीकेमधून रोपे वाहतूकीसंबंधी, वाहतूक नियोजन आराखडा (Transport Plan ) तयार करावा.

(६) हवामान, पाण्याची उपलब्धता व भौगलिक परिस्थिती विचारात घेवून सावली देणारे, शोभिवंत आणि फळ-फळावळ देणाऱ्या वृक्ष प्रजाती प्राधान्याने लावण्यात याव्यात. त्याचप्रमाणे, वृक्ष लागवडीच्या एकूण उद्दिष्टांमध्ये किमान १०% बांबू प्रजातींची लागवड करावी. त्याव्यतिरिक्त करावयाच्या वृक्ष लागवडीमध्ये प्रामुख्याने आंबा, चिंच, आवळा, कवठ, काजू, फणस, वड, पिंपळ, निम, पळस, क्यॅशिया, गुलमोहर व चाफा इत्यादी रोपांचा समावेश करण्यात यावा. स्थानिक परिस्थितीनुरूप अन्य रोपांची निवड व लागवड करण्यास मोकळीक असेल, जेणेकरुन पशु-पक्षी यांचा अधिवास (Habitation) व अन्न साखळी (Food Chain) टिकून राहील आणि जैवविविधतेचे (Bio-Diversity) संरक्षण व संवर्धन होण्यास मदत होईल.

उदा.-

(I) प्रदूषण नियंत्रणासाठी- वड, पिंपळ, तामन, आंबा, शिसम, अगस्ती, चिंच, फणस, बेल, सप्तपर्णी, काशीद, सोनमोहर, चाफा इ.

(II) शहर सौंदर्यीकरणासाठी- शिरीष, पळस, बहावा, कैलासपती, अनंत, आकाशनिम, बकुळ, पारिजातक, अशोक इ.

(II) जल संवर्धनासाठी- बांबू, गिरिपुष्प, बोर, डूरंगी, पिपळी इ.

(IV) सावलीसाठी- वड, पिंपळ, महुवा, कुसुम, जांभूळ, बेहडा, फणस, आंबा इ.

(V) फळफळावळीसाठी- आंबा, आवळा, चिंच इ.

(७) या कार्यक्रमासाठी वन आणि सामाजिक वनीकरण योजनांतर्गत, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (मजीनरेगा/ MNREGA), रोजगार हमी योजना, वनमहोत्सव आणि कॅम्पांतर्गत तयार करण्यात आलेल्या रोपवाटीकांमधून पुरेशा संख्येत व पुरेशा उंचीची, दर्जेदार, गुणवत्तापूर्ण आणि सुदृढ रोपे उपलब्ध करून घ्यावीत. त्याचबरोबर, कृषी विभाग, नियोजन विभाग (रोजगार हमी योजना) व आवश्यक वाटल्यास इतर विभागाकडील रोपवाटीकांमधून रोपांची उपलब्धता करून घ्यावी. रोपांच्या उपलब्धतेबाबत वन विभागांतर्गत प्रत्येक जिल्ह्यातील उपसंचालक, सामाजिक वनीकरण आणि तालुका स्तरावर लागवड अधिकारी यांची "नोडल अधिकारी" म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. आवश्यकतेनुसार त्यांचे आणि स्थानिक स्तरावर वन व सामाजिक वनीकरण विभागाचे अधिकारी आणि कर्मचारी यांचे मार्गदर्शन व सल्ला घ्यावा.

(८) वृक्ष लागवडीच्या काळात वन व सामाजिक वनीकरण विभागातंर्गत वर नमूद रोपवाटिकामधून सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा केला जातो. या योजनेचा लाभ घेण्यात यावा. जेथे शक्य असेल तेथे उद्योजकता सामाजिक दायित्व (CSR) माध्यमातून रोपांची खरेदी करण्यात यावी. तसेच वृक्ष लागवड करावयाची स्थळे विचारात घेवून, त्यानुसार जिल्हा किंवा तालुका स्तरावरील सामाजिक वनीकरण विभागांतर्गत लागवड अधिकारी (वनक्षेत्रपाल) किंवा जिल्हा स्तरावरील उपसंचालक, सामाजिक वनीकरण (विभागीय वन अधिकारी) यांच्याकडे रोपांची मागणी नोंदवावी.

९) वृक्षलागवडीच्या कार्यक्रमांतर्गत निश्चित केलेल्या स्थळांच्या ठिकाणी ठरवून दिलेल्या उद्दिष्टांप्रमाणे मजुरांची निश्चिती करुन रोपे लागवडीच्या दिवशी पुरेसे मजूर उपलब्ध होतील, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

१०) सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची यंत्रणा तसेच खाजगी व अशासकीय संस्था इत्यादीचा सहभाग घेण्यात यावा.

११) या शिवाय शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थी, नागरिक, स्वयंसेवक आणि वर नमूद अशासकीय संस्था इ. सर्वांनी वृक्ष लागवड स्थळांवर वृक्षारोपणास उपस्थित राहण्यासाठी आवश्यक ते नियोजन करावे. तसेच, महानगरपालिका/नगरपरिषदांनी ५ जून (पर्यावरण दिन) पासून जनजागृती कार्यक्रम, शालेय विद्यार्थ्यांच्या स्पर्धा, वृक्ष दिंडी असे उपक्रम राबवावेत व शालेय विद्यार्थ्यांना प्रोत्साहनपर बक्षिसे व प्रमाणपत्रे देण्यात यावीत.

१२) मा. पालक मंत्री, स्थानिक आमदार, खासदार व इतर लोकप्रतिनिधी, प्रतिष्ठित व्यक्ती, स्थानिक स्वराज्य संस्थांचे पदाधिकारी यांचे मार्गदर्शन घेवून जेथे शक्य असेल तेथे त्यांच्या हस्ते वृक्षारोपन करण्यात यावे.

१३) वृक्षारोपणाच्या दिवशी जसजसे वृक्ष लागवड होईल त्या संदर्भातील माहिती (शक्य असल्यास छायाचित्रांसह) वेळोवेळी वन विभागाच्या www.mahaforest.nic.in या संगणक प्रणालीवर अपलोड करावी. यामध्ये किती वृक्षांची लागवड करण्यात आली, कोणत्या व्यक्तींनी/संस्थांनी तसेच कोणत्या प्रजातीच्या वृक्षांची लागवड केली याबाबतची माहिती त्यात अंतर्भूत असावी. (Real Time Data Capture).

१४) या कार्यक्रमाचे नियोजन, अंमलबजावणी, समन्वय आणि संनियंत्रण यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली आहे. तसेच तालुका आणि ग्रामस्तरावर देखील समित्यांचे गठण करण्यात आले आहे. या समित्यांचे सदस्य आणि कार्यकक्षा याबाबत सविस्तर सूचना संदर्भाधिन शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक:सावनि-२०१५/प्र.क्र.१३१/फ-११, दि.३१.०३.२०१६ व दि. १०.१०.२०१६ अन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच, स्थानिक लोकप्रतिनिधी यांच्या वृक्ष लागवड व त्यानंतर किमान ३ वर्षे त्यांचे संरक्षण व संगोपन या संदर्भातील योगदानाविषयक आवश्यक त्या सूचना या शासन निर्णयाद्वारे देण्यात आल्या आहेत, त्याप्रमाणे कार्यवाही करावी.

८. वृक्षारोपणाचा दृश्य परिणाम दिसून येण्यासाठी, संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांचे संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण, कायम स्वरुपी देखभाल, निगा, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करावा व त्यानुसार कार्यवाही व्हावी. तसेच, या वृक्षांचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival rate) किमान ८०% ते ९०% राहणेबाबत काळजी घ्यावी.

९. या कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच, आवश्यक तेथे सी.एस.आर. फंडातून तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. जिथे निधीची अडचण असेल त्या ठिकाणी वन व सामजिक वनीकरण विभागामार्फत मोफत रोपे देण्याचा प्रयत्न केला जाईल. त्याबाबतची आवश्यक ती नोंद आणि लेखा इत्यादीबाबत रोपे उपलब्ध करुन घेणारा विभाग आणि रोपे उपलब्ध करुन देणारा विभाग अशा दोनही विभागांमार्फत ठेवण्यात यावा. तसेच, ह्याबाबतची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर, सचिव (वने) आणि नगर विकास विभागास पाठविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१८०७१६९८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.03.06 18:13:03 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव

**प्रत-**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, (नवि-१), मंत्रालय, मुंबई
५. सचिव, नगर विकास विभाग, (नवि-२), मंत्रालय, मुंबई
६. सचिव, वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८. प्रधान मुख्य, वनसंरक्षण (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. विभागीय आयुक्त, महसूल विभाग (सर्व).
१०. जिल्हाधिकारी, सर्व
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१२. मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपंचायत (सर्व).
१३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती, नवि-३४

विवरणपत्र-१

**Year ----------:- Online Format For Tree Plantation.** **PIT Digging (Year ---------)**

| Division | District | Taluka | Village | Compartment No/Gat. No. | Latitude-Longitude | Plantation Target | PITs/Trench Achievement During the Month | | | | Total | Percentage of PITs Completed |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | Feb. | March | April | May | | |
| | | | | | | | | | | | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | ६ | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 |
| One Time Entry | | | | | | | | | | | =8+9+10+11 | =12/7*100 |

**Planting**

| Division | District | Taluka | Village | Compartment No/Gat. No. | Latitude-Longitude | Plantation Target | Total No. of PITs | Planting Achievement | | | Total | Percentage of Planting |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | First week | Second week | Third week | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | | | 10 | 11 |
| | | | | | | | | | | | | |
| Linked with PIT Digging | | | | | | | | | | | | =10/7*100 |

विवरणपत्र-२

जिल्ह्याचे नाव :-

सन २०१७ ते २०१९ या प्रत्येक वर्षामध्ये जून-जुलै महिन्यात केलेल्या वृक्षारोपणाची माहिती व वृक्षाचे जिवंत राहण्याचे प्रमाण याची आकडेवारी दर्शविणारे विवरणपत्र
( त्रैमासिक अहवाल )

| अ.क्र. | वृक्षारोपनासाठी निवडलेली स्थळे. | वन व सामाजिक वनीकरण विभागाकडून प्राप्त झालेल्या रोपांची संख्या. | वृक्षारोपनासाठी सहभाग घेतलेल्या यंत्रणा. | दिनांक --------- रोजी लागवड केलेल्या रोपांची संख्या. | जिवंत रोपांची संख्या व टक्केवारी. | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| | | | | | | |

-सही-
विभागीय आयुक्त ( महसूल )